पिंपरी-चिंचवड, पोलीस आयुक्तालय येथे बदली होऊन आलेल्या अधिकारी/कर्मचारी यांना त्यांचे पूर्वीचे सेवा निवासस्थान ताब्यात ठेवण्यास परवानगी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक शानिवा-०७२२/प्र.क्र.२६७/पोल-७.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांक - २ ऑगस्ट, २०२३.

**वाचा** :- १) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक शानिवा-०१२१/प्रक्र.१०५/पोल-७, दिनांक १३.१०.२०२१.
२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र. पोमसं/२७/पो.आ. पिंपरी चिंचवड/शासकीय निवासस्थान/१७/२२, दिनांक १२.०७.२०२२.

**प्रस्तावना.-**

शासनाने नव्याने निर्माण करण्यात आलेले पिंपरी- चिंचवड पोलीस आयुक्तालयातील अधिकारी / कर्मचारी यांना, संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयानुसार मिरा-भायंदर-वसई-विरार पोलीस आयुक्तालयातील अधिकारी / कर्मचारी यांना शासकीय सेवा निवासस्थान ताब्यात ठेवण्यास दिलेल्या मंजूरीच्या धर्तीवर शासकीय निवासस्थान ताब्यात ठेवण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यावर शासनाने आता पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

शासनाने नव्याने निर्माण करण्यात आलेले पिंपरी- चिंचवड पोलीस आयुक्तालयातील पोलीस आयुक्त, पुणे, शहर, पोलीस अधिक्षक, पुणे ग्रामिण व पोलीस महानिरीक्षक, कोल्हापूर परीक्षेत्र यांच्या आस्थापनेवरील प्रशासकीय कारणास्तव नियुक्त केलेले आणि कार्यरत असलेले अधिकारी / कर्मचारी यांना बदलीच्या पूर्वी उक्त घटकाच्या सेवेत असताना वितरीत करण्यात आलेले सेवा निवासस्थान दिनांक ३१.०३.२०२४ पर्यंत ताब्यात ठेवण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. पोलीस आयुक्त, पिंपरी- चिंचवड पोलीस आयुक्तालय यांनी संबंधित अधिकारी / कर्मचारी यांचे वेतनातून नियमानुसार भत्ता, अनुज्ञप्ती शुल्क इ. वसूल करुन त्याप्रमाणे संबंधित ज्या आस्थापनांचे निवासस्थान असेल त्या आस्थापनांना त्याप्रमाणे वेळोवेळी कळविण्यात यावे.

३. पोलीस महासंचालक व पोलीस आयुक्त, पिंपरी- चिंचवड यांनी, त्यांच्या आस्थापनेवरील अधिकारी / कर्मचारी यांच्यासाठी निवासस्थान बांधकाम दिनांक ३१.०३.२०२४ पुर्वी पूर्ण करण्यासाठी सर्वतोपरी प्रयत्न करावेत.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८०८१२२८३७८२२९ असा आहे. हा शासन निर्णय डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARAYAN BIRA MANE

Digitally signed by NARAYAN BIRA MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ï¿¿HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1dfb457576797050f19aafaa495673fc843c789942459cd39fc5561071b4a70c, pseudonym=D53E4970DA18F4240576F3F34F92F7E069E6A52A, serialNumber=79C09BA352C5B3E65B259113F1CDCFAB29FB961D4EA9A24411D7F622D2ED20BF, cn=NARAYAN BIRA MANE
Date: 2023.08.08 12:33:19 +05'30'

**( नारायण बिरा माने )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई.
३) विशेष पोलीस महानिरीक्षक, कोल्हापूर परीक्षेत्र, कोल्हापूर.
४) पोलीस आयुक्त, पुणे शहर, पुणे,
५) पोलीस आयुक्त, पिंपरी- चिंचवड पोलीस आयुक्तालय, पिंपरी-चिंचवड, जि. पुणे.
६) पोलीस अधिक्षक, पुणे ग्रामिण, पुणे.
७) निवड फाईल (पोल-७).